**मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, मुंबई कार्यालयाच्या अधिपत्याखालील गट-ड संवर्गातील २५ टक्के पदे निरसित करणेबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्र. ईएसटी-२०१९/प्र.क्र.८०/प्रशासन-१**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- २४ फेब्रुवारी, २०२०

**संदर्भ :-** १) सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय, क्र. ईएसटी-१००३/ प्र.क्र.७६/ प्रशासन-१ दि. ११ ऑक्टोबर, २००४
२) वित्त विभाग, शासन निर्णय, क्र.संकीर्ण-२०१५/प्र.क्र.५७/२०१५/विसु-१ दि. १४ जानेवारी, २०१६
३) मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे क्र. मुवाशा/७२ दि. १० जानेवारी, २०२० रोजीचे पत्र

**प्रस्तावना-**

वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र. २ च्या शासन निर्णयान्वये गट-ड संवर्गात मंजूर पदांपैकी २५ टक्के पदे निरसित करण्यासाठी प्रशासकीय विभागांना सहा महिन्यांची मुदत देण्यात आली आहे. त्यानुषंगाने सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अधिपत्याखालील मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, मुंबई व त्यांच्या अधिपत्याखालील कार्यालयांमधील गट-ड संवर्गातील २५ टक्के पदे निरसित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अधिपत्याखालील मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, मुंबई व त्यांच्या अधिपत्याखालील कार्यालयांसाठी संदर्भाधीन क्र. १ च्या शासन निर्णयान्वये आकृतिबंध मंजूर करण्यात आला होता.

२. वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र. २ च्या शासन निर्णयातील परिच्छेद - ५ च्या तरतुदीनुसार गट-ड संवर्गातील मंजूर पदांच्या २५ टक्के पदे निरसित करणे आवश्यक आहे. त्यानुसार मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, मुंबई व त्यांच्या अधिपत्याखालील कार्यालयांमधील पुढील तक्त्यात नमूद पदे निरसित करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

| **अ. क्र.** | **पदनाम** | **निरसित करावयाची पदे** |
|---|---|---|
| १ | लोहमुद्रक | ०१ |
| २ | शिपाई | ०५ |

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२००२२४१६३३२३९४१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Nisha Manohar Mahajan

Digitally signed by Nisha Manohar Mahajan
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9a9f1749dec86c69520dc99c8a73d64e830153ee031b1b93c743e21a94cd3e93, cn=Nisha Manohar Mahajan
Date: 2020.02.24 16:36:09 +05'30'

**( नि. म. महाजन )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत-**

१. मा. मंत्री (सार्वजनिक बांधकाम), यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
२. मा. राज्यमंत्री (सार्वजनिक बांधकाम), यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३. अप्पर मुख्य सचिव (सार्वजनिक बांधकाम), यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
४. सचिव (रस्ते) यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. सचिव (बांधकामे) यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. महालेखापाल, (लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई , नागपूर
७. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई , नागपूर
८. मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, मुंबई
९. सर्व सह सचिव / उप सचिव सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. सर्व अवर सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
१२. अधिदान व लेखाधिकारी , वान्द्रे (पूर्व), मुंबई
१३. जिल्हा कोषागार / उपकोषागार अधिकारी, महाराष्ट्र राज्य, नागपूर
१४. निवडनस्ती (कार्यासन- प्रशासन-१).